त्या वेळच्या बुद्धिमंतांना काय काय कल्पत्या लढवाव्या लागल्या असतील ते एक त्यांच्या देवालाच ठाऊक !

इतक्या लहानशा खेडेगांवाला एवढें मोठें देऊळ शोभत नाहीं. ' नाका-पेक्षां मोती जड ' म्हणतात तसें तें दिसतें. पेठेच्या तोंडाशीं येतांच दोन बाजूंना दोन दीपमाळा, मध्ये एक जयस्तंभ, तिथेंच चौघडा आणि त्याच्याच खालीं मूषकराजाचें महाबिल आहे. हें गजाननाचें पुढच्या दोन हातांत ' गुडलड्डु ' घेऊन बसलेलें वाहन, दहा पायल्या दाणे आपल्या पोटांत सहज रिचवूं शकेल. मीं मनांत म्हटलें, हा उंदीर दगडाचा आहे म्हणून ठीक. नाहीं तर गांवांतल्या लोकांना बारा महिने तेरा काळ विनायकीचा उपवास घडवला असता यानें ! उंदराच्यापुढें बराच उंच दगडी चौथरा आहे. त्यावर पुढच एक भला भक्कम नंदी गणरायापुढें मोहर करून बसला आहे. मी म्हणालों, ' नंदीचें इथें काय प्रयोजन ? ' हा आपल्या धन्यावर रुसून त्याच्या पुत्राकडे कसलें तरी गाऱ्हाणें घेऊन आला आहे काय ? त्या वेळीं खुलासा झाला नाहीं. पुढे क्षेत्रवर्णनाचें पुस्तक वाचतांना ते प्रकरण मिळालें.

इथून सुमारे पांच कोसांवर भुलेश्वर नांवाचें एक शिवस्थान आहे. तिथल्या ग्रामस्थांनीं आपल्या देवळासमोर बसविण्यासाठीं हा नंदी दुसऱ्या एका गांवीं घडवायला लावला होता. एका मोठ्या गाड्यावर चढवून गांवकरी त्याला घेऊन चालले होते. मोरगांवावरूनच त्याची वाट होती. पण आश्चर्य वर्तलें तें असें कीं, गणरायाच्या दारावरून जात असतां तो गाडा एकाएकीं मोडला. दुसरा आणला पण त्याचीहि तीच गत झाली. लोकांना वाटलें कीं, गाड्याना वजन पेलत नसेल. म्हणून त्यांनीं नंदी तासून–घासून लहान करायचें ठरविलें. पण त्याच रात्रीं स्वप्नदृष्टान्त देऊन नंदीनें सांगितलें कीं, ' मला तिकडे नेण्याचा प्रयत्न करूं नका. तो साधणार नाहीं. मला इथेंच गणरायापुढें बसावयाचें आहे. ' त्यामुळें लोकाचा निरुपाय झाला आणि त्यांनीं त्याची इथें स्थापना केली आणि ते निघून गेले. तो उघड्यावर बसतो हें पाहून, त्याला निवारा करणें क्रमप्राप्त झालें आणि तें काम कोण्या पानसरे नांवाच्या वाण्यानें केलें.

नंदीच्या चौथऱ्यापुढें देऊळ आणि त्याचा प्राकार यांचा दुसरा दगडी चौथरा लागतो. तो त्याहून थोडा उंच आहे. महाद्वारांतून आंत जातांच

आणखी दोन दीपमाळा आणि त्यापुढें देवालय आहे. सभामंडप, मध्यगृह आणि गाभारा मिळून सगळें देऊळ पाषाणाचें आहे. तटाच्या आंतल्या अंगाला लहान लहान ओवऱ्या आहेत. ओवऱ्यापुढें प्रदक्षिणेची चिरेबंदी वाट आहे. बेल, शमी, आवळी हे देवाचे आवडते तरुवर प्राकारांतच आहेत. शिखरावर प्रत्येक कोनाडयांत गाणपत्य पुराणांतले कथाप्रसंग चित्रित केले आहेत.



देवदर्शन करून प्रदक्षिणेला निघालें कीं प्रथम देवाच्या उजव्या हातास मंदिराला चिकटूनच नग्नभैरवाचा कौलारू मंडप लागतो. नग्नभैरव हा असितांग, रुरु, इत्यादि सर्व भैरवांचा मुख्य आहे. वाराणशींत काळभैरवाचें जें काम तेंच इथें नग्नभैरवाचें. तो इथला क्षेत्रपाल आहे. देवळाच्या पृष्ठभागीं आदिशक्तीची पाषाणमूर्ति आहे. तिच्या भक्तिभावाला भुलून गजानन जवळच्याच कल्पवृक्षाखालीं साजिरें गोजिरें शिशुरूप घेऊन प्रकट झाला. वस्तुतः तें झाड तरटीचें आहे. पण देवीचें वांछित त्याखालीं साकार झालें, म्हणून त्याला कल्पवृक्ष ही पदवी लाभली.

या प्राकारांत लहान-मोठ्या गणेशमूर्तींचें वैपुल्य आहे. रामानें लिंग स्थापलें तो रामेश्वर, सोमानें स्थापलें तो सोमेश्वर, हा जसा शिवभक्तीचा एक प्रकार.

तसाच इथें शिवपुत्राच्या बाबतींत दिसतो. एखाद्या भक्तानें यावें, अनुष्ठान करावें, साक्षात्कार घ्यावा आणि जातांना आपल्या नांवानें एक गणेशमूर्ति कुठें तरी स्थापून निघून जावें. इथें समर्थ रामदास आणि तुकोबा यांनीं स्थापलेलेहि गणपति दाखवितात. पण समर्थ गणेशाबरोबरच मारुति आणि तुकोबा राही-रखुमाबाईसहित विठ्ठल, हीं आपलीं आवडीचीं उपास्यें इथें उभीं करायला विसरले नाहींत. ' सुखकर्ता दुखहर्ता ' ही गणपतीची लोकप्रसिद्ध आरती याच मोरयासमोर समर्थांच्या मुखांतून जन्म पावली असेंहि सांगण्यांत येते.

देवाच्या डाव्या हाताला विघ्नहराची ओवरी आहे. या ओवरीशीं एका परमहंस पुरुषाचें नांव निगडित आहे. सत्पुरुषांचें वास्तव्य नसेल तर केवढेंहि मोठें क्षेत्र पोरके भासतें. मूर्तीला माहात्म्य चढत नाहीं. सत्पुरुष हे क्षेत्राचे प्राण आहेत. शके १५२० च्या सुमारास सौराष्ट्रांतल्या सोरटी सोमनाथाहून एक सिद्धयोगी इथें क्षेत्रवासाकरितां प्राप्त झाले. ते गणेशसंप्रदायाचे महान् आचार्य होते. त्यांना गणेश–योगींद्र म्हणत. त्यांनीं ओवरींत राहून बार वर्षें श्रींची आराधना केली. त्यांच्या मनांतून मुद्गल पुराणावर टीका लिहून गाणपत्य धर्माला नवीन उजळा द्यावा असें फार होतें. पण मूळ प्रतच कुठें गवसेना. त्यांनीं ती मिळविण्यासाठीं पुष्कळ परिश्रम केले आणि ते यशस्वी होत नाहींत असें दिसल्यावर मग देवाला सांकडें घातलें. भक्ताचें आर्त न पुरवील तर तो देव कसला ! गणेशानें मग एक दिवस एका ब्राह्मणाच्या रूपाने ती पोथी योगींद्रांच्या हातीं आणून दिली. या देवस्थानाच्या ऊर्जितावस्थेंत गणेश-योगींद्रांचा फार मोठा हात आहे. तट आणि सभामंडप उभारणारे रा. गोळे हे योगींद्रांचेच शिष्य होते. पेशव्यांच्याही कांहीं पुरुषांनीं त्यांचें शिष्यत्व पतकरलें होतें. योगींद्रांच्या आज्ञेवरून अमृतराव पेशवे यांनीं देवळाचें महाद्वार बांधलें आणि बाजीरावानें चौघडा ठेवला.

या ओवरीच्या भिंतीवर गणेश-योगींद्रांनीं स्वहस्तें काढलेलीं गणेशलीलांचीं किती तरी चित्रें अजून पहायला मिळतात. एक सिंदूरचर्चित गणपतीहि तिच्यांत आहे. शेवटीं शेवटीं ते दिवसांतला बराच काळ समाधिस्थितींतच रहात. सिद्धेश्वर नांवाचा एक पट्टशिष्य त्यांची सेवा करी. गणेश–योगींद्रांच्या-मुळें अनेक विद्वान् आणि सत्पुरुष या ठिकाणीं आले. किती तरी धर्मचर्चा

आणि तत्त्वचर्चा रंगल्या. शके १७२७ माघ वद्य दशमीला त्यांनीं समाधि घेतली. त्यांच्यामागून तीन वर्षांनीं त्यांचे शिष्य सिद्धेश्वरहि समाधिस्थ झाले. करेच्या तीरीं गुरूच्या पायांजवळच शिष्याचीहि समाधि बांधलेली आहे.



या क्षेत्राशीं आत्मनाम कायमचें निगडित करणारे दुसरे सत्पुरुष म्हणजे चिंचवडचे मोरया गोसावी. चौदाव्या शतकांत यांचा जन्म झाला आणि तोहि नवसासायासानें. वामनभट्ट शाळिग्राम यांनीं याच मोरगांवांत तप केलें आणि वयाची पन्नाशी उलटल्यावर ते पुत्रवान् झाले. आठव्या वर्षी मोरया गोसाव्यांचे उपनयन झालें. थोड्याच कालांत ते घनपाठी वैदिक झाले. गणेशाच्या प्रसादानें जन्मलेला पुरुष गणेशभक्त झाला नसता तरच नवल. थेऊर येथें त्यांनीं गणपतीची उग्र आराधना केली. गणाधीश त्यांजवर तुष्टला. लोक त्यांना गणेशाचे अवतार समजूं लागले. मूळचें आडनांव शाळिग्राम ; पण लोक त्यांना देव म्हणूं लागले आणि तेंच पुढें त्यांच्या वंशाचें आडनांव झालें. त्यांनीं दर चतुर्थीला मोरगांवची वारी धरली. करा नदींत स्नान करतांना त्याना एके दिवशीं अभोगत एक गणेशमूर्ति हातीं लागली. करेच्या तीरीं शमी वृक्षाखालीं त्यांनीं तिची पूजा केली. ‘ सर्वशाक ’ आणि ‘ पोळी ’ यांचा महानैवेद्य समर्पिला. पुढें श्रींच्या आज्ञेवरून चिंचवडास ती मूर्ति स्थापून नवें

संस्थान उभारलें. पुढें ते वर्षांतून दोनदाच म्हणजे माघी आणि भाद्रपदी चतुर्थीसच मोरगांवीं येऊं लागले. प्रतिपदेपासून चतुर्थीपर्यंत इथें राहून उपासना चालवायची, पंचमीच्या दिवशीं पारणा करायची, आचंडाल सर्वांना समाराधना घालायची आणि नंतर परत फिरायचें असा त्यांनीं क्रम ठेवला. चिंचवड संस्थान संपन्न झाले तेव्हां तर 'पोवळीं'त (करेच्या कांठचा एक भाग) सव्वा खंडीचें अन्न शिजूं लागलें. हीच प्रथा पुढें त्यांच्या वंशजांनींहि चालू ठेवली. अद्यापहि भाद्रपदी-माघी यात्रेला चिंचवडहून 'देव' येत असतात. मोरगांवची सर्व व्यवस्था चिंचवड संस्थानांतून होत असते.

देवदर्शन झाल्यावर तीर्थदर्शन ओघानेंच आलें. गांवाला लागूनच करा नदी आहे. सिंहगडाच्या पूर्वेस पांच मैलांवर ही उगम पावते आणि पुरंदर-भीमथडी तालुक्यांतून पन्नास-साठ मैलांचा प्रवास करून बारामतीच्या आग्नेय कोपऱ्यांत नीरेला मिळते. आम्ही गेलो तर पात्र बरेंचसें कोरडेंच दिसलें. 'श्रावण-भाद्रपद वर्षा ऋतु' हें तिनें फक्त पंचांगांतच वाचायचें. दुर्दैवानें अशा एका भूभागांतून तिला वाटचाल करावी लागली आहे कीं, ज्यावर जेमतेम दहा-बारा इंचांपेक्षां अधिक पाऊस पडत नाहीं. त्यामुळें तिला तारुण्याची पुष्टि आणि मस्ती क्वचितच लाभते. कलाशेष चंद्र शोभत असला तरी सुकून ओहोळासारखी झालेली नदी मात्र शोभत नाहीं. दोन्ही तीरांना धडका देणारी, तीरस्थ वृक्षांचा आरसा बनणारी, 'आवर्त-बुद्बुद-तरंग' खेळवणारी अगाध सरिताच मनावर पुण्य संस्कार उमटवूं शकते.

आम्ही कांठाकांठानें जरासे हिंडलों. जवळच्याच एका शेतांत मोट चालू होती. तिच्या कोवळ्या कुरकुरीबरोबरच बैलांना आळवणारें कृपकाचें संगीतहि सुरू होतें. शहरांतले मोटारीचे पोंगे आणि टांगेवाल्यांचे विचित्र आवाज ऐकून आंबलेल्या कानांना तें जनपदांतलें सनाद संगीत मोह घालीत होतें. एवढ्यांत कुठून तरी 'मोरोपंतांची केकावली' अकल्पितपणें कानीं पडली आणि मग माझ्या लक्षांत आलें कीं, इथला विनायक मयूरवाहन आहे. इथें मोरांची बरीच वस्ती आहे. बरोबरच्या गृहस्थांनीं सांगितलें कीं, ते त्यांच्या परसदारींसुद्धां येतात आणि शेंगदाण्याचें आमिष दाखवलें तर पिसारा फुलवून नाचतातहि. एकाएकीं त्यांना वाचा फुटायला एक कारण घडलें. सूर्य-मंडलावर मेघांनीं आडंबर उठवलें होतें. तो सगळा प्रदेश मेघच्छायेंत आला

होता. त्या बिचाऱ्या तीर्यक्‌जीवांना वाटलें असेल कीं, आता पाऊस पडणार, आपला पिसारा ओला होणार. त्यांना कोणीं तरी सांगणें भाग होतें कीं, सगळीं माणसे जशीं सज्जन नसतात, तसे सगळे मेघहि उदार नसतात. पण सांगून तरी उपयोग काय? त्यांचें हें मूढपण सनातन आहे. प्राचीन काळीं हिमाचलाकडे जाणाऱ्या दिलीपाचा रथध्वनि ऐकूनहि यांना मेघगर्जनेचाच भास झाला होता आणि षड्जसंवाद करणाऱ्या केका झोंकून आतां जसें माझें, तसें त्या वेळीं दिलीपाचें मन त्यांनीं रिझविलें होतें.

करेहून आल्यावर मी इथल्या योगींद्रमठाकडे वळलों. गणेश-योगींद्राच्या शिष्यपरंपरेंतल्या गाणपत्यांनीं हा मठ स्थापला असून संप्रदायाचा पुरस्कार करणारें 'अंकुश' नांवाचें एक मासिकहि चालविलें आहे. सांप्रतच्या मठपतींची भेट घेतल्यावर त्यांनीं मला क्षेत्रासंबंधीं पुष्कळ गोष्टी सांगितल्या—

"मोरगांव हे पुरातन क्षेत्र आहे. याला 'भूस्वानंद' अशी दुसरी संज्ञा आहे. इथला गणराज हा 'स्वानंदेश' आहे. पांच देवांना वर दिला म्हणून तो 'पंचदेववरद' झाला आहे. त्रेतायुगांत मैथिल देशांत सिंधुदैत्य माजला. त्यानें सर्व देवांना 'त्राहि भगवन्' केलें. त्याच्या बंदींतून सुटण्यासाठीं देवांनीं स्वानदेश गणरायाची आराधना केली. त्यानें सिंधूला मारून देवाचें संकट निरसलें. देव परत या क्षेत्रीं येण्यासाठीं निघाला असतां सिधुदैत्याचा सेनापति कमलासुर यानें त्याला वाटेंत गांठलें. दोघांचे तुंबळ युद्ध झालें. गणेशानें त्रिशूळ फेंकून त्याचें मस्तक उडविलें ते इथें येऊन पडलें. गणराज इथें आला आणि त्या मस्तकाचेच आसन करून त्यावर अधिष्ठित झाला—"

बोलतां बोलतां गृत्समदाचा उल्लेख निघाला. गृत्समद हा वैदिक ऋषि पहिला गाणपत्य असें म्हणायला हरकत नाहीं.

"गणानां त्वा गणपतिं हवामहे
कविं कवीनामुपमश्रवस्तमम्।
ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत
आनः शृण्वन्नूतिभिः सीद सादनम्॥"

हा गणेशपूजेंतला सर्वश्रुत आवहनमंत्र त्याचाच आहे. तो म्हणतो— " समुदायाचा प्रभु म्हणून तूं गणपति. ज्ञानी जनांत तूं अत्यंत ज्ञानी. कीर्तिवंतांमध्यें तूं वरिष्ठ. तूंच राजाधिराज. तुला आम्ही आदरानें बोलावतों. तूं आपल्या सर्व शक्तींसह ये आणि ह्या आसनावर विराजमान हो.'

पण गृत्समदानें प्रार्थिलेला हा गणपति त्या काळीं गजवदन नव्हता; तर ब्रह्मणस्पति होता. तो विघ्नेश नव्हता; तर विद्येश होता. अजून त्याला हत्तीची सोंड लागायची होती. ती मग पुराणकाळीं लागली.

एके दिवशीं पार्वतीनें आपल्या अंगच्या उटण्याचा एक द्वाररक्षक बनवून बाहेर उभा केला आणि ती आंत स्नानाला गेली. थोड्या वेळानें शंकर आंत जाऊं लागला, तर हा त्याला सोडीना. धन्यावर चाकराची कुरघोडी म्हणजे काय गोष्ट आहे! शंकरानें क्रोधाच्या पहिल्या झटक्यास त्याचें शिर उडवलें. पण शिव कठोर झाला तरी पार्वतीला त्याच्याविषयीं माया होती. तिनें त्याला जिवंत करण्याबद्दल आग्रह धरला. मग शंकरानें गजासुराचें शिर छेदून आणलें आणि त्याच्या धडावर बसविलें. पार्वतीचा मानसपुत्र अशा रीतीनें गजानन झाला.

शैवांची शिवरात्र, वैष्णवांची एकादशी तशी गाणपत्यांची चतुर्थी. या चतुर्थीत एका रहस्याचें सूचन आहे. चतुर्थी म्हणजे जाग्रत्स्वप्नसुषुप्तींच्या पलीकडची तुरीया अवस्था. जीवाचें परमसाध्य. त्या दिवशीं चंद्र पहायचा नाहीं, म्हणजे चंद्राकडे पाठ करायची. चंद्र ही मनाची संतति आहे. 'चंद्रमा मनसो जातः।' ग्रहमालेंत चंद्र सगळ्यांत द्रुतगतीचा तर शरीरांत मनहि तसेंच चंचल. हें मन जेव्हां उन्मन होईल, तेव्हांच तुरीयावस्था सिद्ध होते. साधूनें खळाची व्यंकटी मोडावी तसें गणेशोपासनेनें मनाचें मनपण मोडून तत्त्वाशीं गांठ घालायची. गणेश हेंच 'प्रत्यक्ष तत्त्व' आहे. तो अथर्वोपनिषदाचा कर्ता सांगतो. 'मी खोटें बोलत नाहीं. ऋतं वच्मि, सत्यं वच्मि.' गणेशसंप्रदायांतला हा गुरुगम्य ठाव आहे.

लिंगपूजेप्रमाणेंच गणेशपूजाहि एका काळीं भूतलाच्या बऱ्याच मोठ्या भागावर रूढ होती. जावा, बाली, इत्यादि बेटांत, अमेरिकेंतल्या मेक्सिको प्रांतांत, त्याचप्रमाणें आशिया खंडांत इतरत्राहि ज्या गणेशमूर्ति वा कोरीव चित्रें संशोधकांनीं उजेडांत आणलीं आहेत, त्यावरून ही गोष्ट सिद्ध होते.

लॅटिन संस्कृतींतली 'जानुस' ही देवता आणि आपला गणेश यांच्यांतलें वर्णसाम्य उपेक्षणीय नाहीं. आपण जसा घरच्या वा मंदिराच्या मुख्य द्वारावर गणपति कोरतो तसेच तेहि आपल्या जानुसला कोरीत असत. तिबेटांत गणेशाला नारीरूपांत भजतात. तिबेटाप्रमाणेच चीन, जपान, इकडे गणेशोपासना गेली ती बौद्धांच्या द्वारें. बुद्ध धर्मांतहि तिला स्थान होतेंच. खुद्द तथागत बुद्धानें आपल्या शिष्यांना 'गणपतिहृदय' उपदेशिलें होतें अशीहि माहिती मिळते. पण पुढच्या काळांत मात्र बुद्धमूर्तीचें वाहन बनवून बौद्धांनीं तिची मानखंडना केली आहे. गणेश हा महादेवाच्या परिवारांतला आहे. महादेव आणि पार्वती यांचीं द्विविध रूपे कल्पिलेलीं आहेत. रुद्र–काली आणि शिव–उमा. गणपतिहि तसाच आहे. विघ्नकर्ता तसाच विघ्नहर्ता.

ब्रह्मा आणि शिव यांनीं गणेश निर्माण केला आणि एका उपद्रवी गणांचें आधिपत्य देऊन त्याला जगांत विघ्नाचें पीक पिकवायला सोडून दिलें. मानवगृह्यसूत्रांत याचा दाखला मिळतो. पहिल्या प्रथम देवदैत्यांच्या समुद्रमंथनप्रसंगीं मंदराचळाची रवी सागराच्या तळाशीं दडपून त्यानें आपलें विघ्नकर्तृत्व जाहीरपणें दाखविलें. स्कंद, विशाख, मेष, शकुनि, पूतना, इत्यादि विनायकगण बालग्रह उत्पन्न करणारा असें पुराणांत वर्णिलें आहे. पण पुढें मानवी मन जसजसें उत्क्रांत होत गेलें, देवताविज्ञानांत जसजशी प्रगति होऊं लागली, तसतसें गणराजाचें विघ्नकर्तृत्व दृष्टीआड होऊन विघ्नविनाशक, सकलपसाधक म्हणूनच तो जनांचा भक्तिविषय झाला. प्रत्येक कार्यारंभीं त्याचें पूजन होऊं लागलें. ग्रंथकार आपला ग्रंथ निर्विघ्न परिसमाप्त व्हावा म्हणून त्याचेच मंगल करूं लागले. दशावतारी नाटकांत प्रथम त्याचेंच सोंग येऊं लागलें. कवनांत पहिलें नमन त्यालाच होऊं लागलें. लग्न-मुंजींत घाणा भरणें किती मामुली गोष्ट! पण सुवासिनी मुसळाला हात लावतांना त्याचींच मंगळें गाऊं लागल्या—

"घाणा भरियेला विडा ठेवियेला
आधीं नमियेला गणेराज"

गणपतीला सकळ विद्यांचा स्वामी समजतात. हें त्याचें स्वरूप आहे. 'ग म भ न' ची शिक्षापद्धति सुरू होण्यापूर्वी आपण विद्यारंभीं धूळपाटीवर 'श्रीगणेशा' गिरवीत होतो त्याचें कारण हेंच. गणपति लेखणीचा फर्डा होता

हें आपल्याला महाभारतावरून कळतें. वेदव्यासांनीं आपला 'जय' ग्रंथ लिहिण्यासाठीं त्यालाच पाचारून आणलें. पण त्यानें एक अट घातली कीं, 'मी लिहीन; पण माझी लेखणी थांबतां कामा नये.' व्यासांनीं म्हटलें 'ठीक आहे, पण श्लोकाचा अर्थ समजल्यावांचून तूं लेखणी ओढतां कामा नये.' आणि मग व्यास मधें मधें एखादा कूट श्लोक रचूं लागले. गणपतीला त्याच्या अर्थाशीं कांहीं काल झगडत ठेवायचें आणि तेवढ्यांत पुढचे बरेच श्लोक रचून टाकायचे, अशा क्रमानें व्यासांनीं तो ग्रंथ पुरा करून घेतला. या घटनेवरून इतिहासाचा शोध घेणारे प्रज्ञावंत असा तर्क चालवतात कीं, त्रिविष्टपांत म्हणजे तिबेटांत 'लेख' नांवाचे गणेशोपासक लोक लेखनप्रवीण असावे आणि आपली लेखनकला आपण त्यांच्याकडूनच संपादली असावी.

वेदांत्यांनीं आणि तत्त्वचिंतकांनीं तर गणपतीला वाङ्मयाच्या तळाशीं आणि नादाच्या मुळाशीं नेऊन बसवलें आहे. योगविद्येंत तो जसा 'मूलाधार' चक्रावर अधिष्ठित आहे तसाच वाग्विद्येंत तो ओंकाररूप आहे. ओंकार हें सर्व शब्दांचें मूळ असून ते गणेशाचें एक विशेषनाम आहे. ॐ आडवा असतो तो जर उभा केला तर तिथें गजवदनाची प्रतीति येते. आणि म्हणूनच ज्ञानेश्वर आपल्या मंगलचरणांत वर्णन करीत असतांना म्हणतात—

**" हें शब्दब्रह्म अशेष । तेचि मूर्ति सुरेख**
**जेथ वर्णवपु निर्दोष । मिरवित असे "**

तांडवनृत्य करीत असतांना शंकराच्या डमरूंतून जीं चौदा प्रत्याहारसूत्रें उमटलीं ते गण आणि त्यांचा स्वामी म्हणजे शिवपुत्र गणपति. प्रणवोपासना ही गणेशोपासना आणि गणेशोपासना ही साक्षात् ब्रह्मविद्या मानलेली आहे. गणपति-अथर्वशीर्ष वरवर ऐकलें तरी या गोष्टीची कल्पना येऊं शकेल. गणपतीचीं जीं इतर अनेक नांवें आहेत त्यांचाहि तात्त्विकांनीं अध्यात्मपरच अर्थ लावून दाखविला आहे. आमच्या महाराष्ट्रसंतांनाही गणपति पार्थिव स्वरूपांत न दिसतां ब्रह्मस्वरूपांतच प्रतीत झाला आहे. 'वक्रतुंड' या नांवांतलें 'वक्र' ती माया आणि 'तुंड' तें ब्रह्म. वक्रतुंड म्हणजे मायेचा अधिष्ठाता. 'लंबोदर' शब्दाची व्युत्पत्ति नाथमुखानें ऐकण्याजोगी आहे—

**" तुजमाजीं वास चराचरा । म्हणोनि बोलिजे लंबोदरा**
**यालागीं सकळांचा सोयरा । साचोकारा तूं होसी**

सुखाचें पेललें दोंद । नाभीं आवर्तला आनंद
बोधाचा मिरवे नागबंद । दिसे सन्निध साजिरा ”

गणपतीचा वर्ण तांबडा, रक्तवस्त्र, रक्तपुष्प आणि रक्तचंदन यांचीच त्याला आवड, या गोष्टींचीहि उपपत्ति लावलेली आहे. ज्या मूलाधारचक्राचा तो स्वामी तें चक्र आणि तिथलें कमळ हीं दोन्ही लाल आहेत. गणपतीचें ज्योतिःस्वरूप पाहिलें तर अग्नि आणि उदयारूढ सूर्य यांच्या वर्णांत लाल रंगच प्रमुख आहे. गणपति हा सृष्टिकर्ता म्हणजे रजोगुणी आणि रजाचा रंग तांबडाच मानतात. मुद्गलपुराण सांगतें कीं, गणेशानें आपल्यासारखें व्हावें म्हणून रक्तवर्णानें कठोर तप केलें आणि गणेशानें कृपावंत होऊन त्या वर्णाचा स्वीकार केला. सिंदुरासुराचें रक्त गणेशानें आपल्या अंगाला माखलें अशी दुसरी एक कथा आहे. ऐतिहासिकांचा तर्क असा कीं, गणपति आणि तत्सम वन्य देव हे बलिदान केलेल्या पशूंच्या रुधिरानें रंगले आहेत.

गणपति हा ग्रहमालेंतल्या मंगळाचे प्रतीक असावें असा एक समज आहे. मंगळ जसा लाल रंगाचा, रजोगुणी, सेनापति आणि उत्पाती तसाच गणपतिहि आहे, हें साधर्म्य या समजुतीच्या मुळाशीं आहे. शिवाय अंगारकी ( म्ह. मंगळवारीं येणारी ) चतुर्थी गणेशविधानांत विशेष महत्त्वाची असल्या-मुळें तोहि एक आधार जमेस धरला जातो. पण खगोलांत जर गणपतीचें मूळ शोधायचे तर मंगळाला वगळून सूर्याकडेच जावें लागेल. अथर्वशीर्षांत त्याला ‘ त्वं विष्णुस्त्वं सूर्यः ’ असें म्हटलें आहे. विष्णु आणि सूर्य हीं नांवें एकाच तेजोनिधीचीं आहेत. पूर्वक्षितिजावरचें आरक्त सूर्यमंडळ हें गजमुख आणि मोतिया रंगाचें प्रभामंडळ हा त्याचा झळाळता किरीट ( Corona ) समजावा. या प्रभावलयाचा कांहीं भाग उंच असतो आणि कांहीं निरुंद असतो ; त्यामुळें त्या निरुंद भागाला ‘ कानीं कुंडलें ’ म्हणायला कांहींच हरकत नाहीं. योग-संसिद्ध पुरुषाच्या सूर्यमंडलभेदी दृष्टीलाच लक्ष्य होणारा हा विषय असला तरी खग्रास सूर्यग्रहणाच्या वेळीं सामान्यांच्या साध्या दृष्टीलाहि ही किरीट-कुंडलांची शोभा गोचर होऊं शकते. सूर्याभोंवतीं वेढून असलेल्या दुसऱ्या एका कक्ष-चावरणांतून वर उफाळणारें लक्षावधि मैल लांबीचें तेजःशृंग तीच गणपतीची वांकडी सोंड. उदयाचल हें त्याचें उच्चासन. ‘ सर्वं जगादिदं त्वत्तो जायते ’ हें गणाध्यक्षाचें वर्णन सूर्यालाच यथार्थत्वानें लागू पडतें. सूर्य हाच आपल्या

विश्वाचा जनक आहे. बुधापासून तों शेवटच्या प्लूटोपर्यंतची ग्रहमाला हा त्याचा गण. सूर्योपासनेतलीं सत सामांचीं एकवीस अक्षरे याच गणरायाच्या एकवीस दूर्वा. विश्वाचे रंग-रूप कुरतडून टाकणारा रात्रीचा अंधार हाच निशाचर उदीर. त्यावर आरूढ होऊनच तो उगवतो. सूर्याला ब्रह्मांडाचें द्वार मानतात तर गजाननाला दाराच्या चौकटीवर बसवून आपणहि तोच आशय सूचित करतों. गणपतीचे चार हात या चार दिशा. सूर्याचे सहस्त्ररश्मि हीच गणेशाची सहस्त्रनामावलि. सूर्याच्या ठिकाणीं सांगसायुध गणेशरूप कल्पून त्याची उपासना करावी असें शास्त्रकर्ते सांगतात. आपल्या ऋषि-मुनींची प्रतिभा कशी अंतराळ भेदून जाऊं शकते आणि कसे ब्रह्मांडाचें आपोशन घेऊन उठते, ते या गणपतीच्या मूलशोधनावरून समजून घ्यावें.

हे झालें गणपतीच्या विभूतिमत्त्वाचें दिव्य अंग. त्याचें लौकिक अंगहि तितकेंच मनोज्ञ आहे. संस्कृत कवींनीं त्यांतलें माधुर्य स्वतः चाखून आमच्यासाठींहि ठेवून दिलें आहे. गजानन हा शिवाचा पुत्र. उमेचा हृदयनंदन. कार्तिकेय षडाननाचा धाकटा भाऊ. कैलासशिखरावर शिव-पार्वतींच्या संसारांत तो अबोध बालरूपानें लुडबुडतो. शिव हा कर्पूर-धवल. गिरिजा चांपेगोरटी. दोघांच्यामध्यें उभा राहून गणराज त्या दोघांच्या वर्णावर आरक्त छटा चढवतो. उरीं प्रेम दाटून बाळाचें चुंबन घेण्यासाठीं दोघांनीं दोन बाजूंनीं तोंडें जवळ आणलीं कीं या खट्याळानें आपलें मुख एकदम मागें घेतलेंच.

एके दिवशीं यानें आपल्या एकदंतानें नागाचें वारूळ पाडलें. त्यासरशीं आंतल्या नागोबाच्या फणामण्याचें किरणजाल उंच उठावलें. या अपक्व-बुद्धीच्या बालकाला वाटलें कीं, तो एक रत्नस्तंभच असून आपण त्यावर गंडस्थळें घासावीं. तो तसें करायला गेला आणि मयसभेंतल्या दुर्योधना-सारखी त्याची फजिती झाली. आईबापांना मग हसतां पुरेवाट. गजाननाला कमलनालाची आवडी विशेष हें सांगणें नकोच. शिवाच्या मस्तकींची रेषामात्र चंद्रकोर म्हणजे तेंच आहे असें समजून स्वारी एकदा त्याला झोंबायला लागली. पण चंद्रकोर तर हाताला आली नाहींच. शिवाच्या भालनेत्राचे चटके मात्र बसले. तशांत जटाबंधाच्या नागानेंहि फुसकारून फणा उभारली. मग काय, एकदम किंचाळीच. आईनें धावत येऊन जेव्हां हृदयाशीं घट्ट धरलें

तेव्हा कुठें यानें डोळे उघडले. मोदक खायचा झाला तरी त्याला एक पुरत नाहीं; एकवीस हवेत. आपल्या आईला अनेक संकटांत उपयोगी पडून तो पुत्रधर्माला जागला आहे. त्यामुळें पार्वतीला त्याचा विलक्षण लळा आहे. गणेशचतुर्थीस तो मनुष्यलोकीं आला कीं पाठोपाठ चार दिवसांनीं ज्येष्ठा नक्षत्रावर गौरी धावून येते आणि लेकाला घेऊन जाते. गंगेच्या सवतीमत्सरानें आईचा जीव पोळतो हें कळून आल्यावर गंगेला कैलासावरून ब्रह्मगिरीवर काढून लावण्यांत या गणेशबाळाचेंच चातुर्य विजयी झालें आहे.

मला थोड्या वेळानें परत निघायचें होतें. माझी अथर्वशीर्षाची 'एकविशी 'हि संपत आली होती. गुरवाने प्रक्षाळपूजा केलेली ती दोंदिल विनायकमूर्ति माझ्या हृदयसिंहासनावर आरूढ होऊं लागली होती. या मूर्तीवरचा थरा-थरांनीं चढलेला सिंदूरलेप सुमारें शंभर वर्षांनीं निखळून पडतो, ही नवलपरी कालच मला कोणीं तरी सांगितली होती. शके १७१० मध्यें हें लुकण झडल्याबद्दल एक श्लोक प्रसिद्ध आहे. त्यानंतर शके १८०४ सालीं तें पुनश्च पडलें. या लुकणाच्या आंतली मूर्ति कशी दिसत असेल, याबद्दल मनाचे उगीचच चाळे सुरू झाले. मन हें अंतःकरण म्हणजे ' आंतलें इंद्रिय ' आहे. अर्थात् प्रत्येक वस्तूच्या आंत रिंगण्याची त्याची खोड स्वाभाविकच म्हटली पाहिजे. पण माझ्या मनाला हिच्याबरोबर दुसरीहि एक आंतर जिज्ञासा होती. या मंदिराच्या खालीं असलेल्या भुयारांत, एका काळीं या प्रदेशावर राज्य करणाऱ्या मयूरवर्म्याचा पुत्र, राजा सुगीत समाधि लावून बसला आहे आणि तो कृतयुग लागल्यानंतर पुनश्च क्षात्रधर्म प्रवृत्त करणार आहे, असें जें मीं वाचले होतें त्यांतलें तथ्य काय? मरु नांवाचा एक राजा योगारूढ स्थितींत कलापग्रामामध्यें बसला असून तो कलियुगाच्या अखेरीस सूर्यवंश पुन्हा चालू करणार आहे असा भागवतांतहि एक उल्लेख आहे. वरील दोन्ही गोष्टी या एकाच जातीच्या आहेत. भारतीय युद्धानंतर भारत देशांत जवळजवळ ' निर्वीरमुर्वीतलम् ' अशी अवस्था आली होती. सर्व जनता आपल्या भवि-तव्याबद्दल सांशक झाली होती. तिच्या मुखावर एकच प्रश्नचिन्ह उमटून राहिलें होतें—' आतां आमचा त्राता कोण ? ' मला वाटतें अशा वेळीं खचलेल्या समाजमनाला त्या वेळच्या भविष्यवेत्त्यांनीं वरील प्रकारें धीराचीं आश्वासनें दिलीं असतील. माणूस आशेवर दिवस काढतो हें काय सांगायला हवे !

---

## : ८ : : गाणगापूर

नरसोबाची वाडी, औदुंबर आणि गाणगापूर हीं तीन अग्रगण्य दत्तक्षेत्रें. पण आश्चर्याची गोष्ट ही कीं, यांतल्या एकालाहि आगगाडीच्या रुळांचा स्पर्श झालेला नाहीं. सगळीं आडवळणालाच आहेत. पुणें–रायचूर लोहमार्गा-वर गाणगापूर नांवाचे स्थानक आहे; पण तिथून खुद्द गाणगापूर उरतें चौदा मैलांवर. त्यामुळे या तिन्ही ठिकाणीं आगगाडींतून उतरल्यावर निराळ्या कोणत्या तरी वाहनाला शरण जावेंच लागतें. या तिन्ही प्रवासांतला माझा अनुभव बराच कडवट आहे. दंडकारण्यांतलीं अति कठोर दुःखेंसुद्धा सगळ्यांतून निस्तरून गेल्यावर आठवणींच्या वेळीं श्रीरामचंद्राला सुखावह वाटलीं असें कविकुलगुरूनें सांगून ठेवलें आहे. माझ्या त्या प्रवासाबद्दल आज मीहि तसेंच म्हणूं शकेन.

पण त्या वेळीं? कोल्हापुराहून वाडीला जाणारी गॅसप्लॅन्ट बसवलेली मोटार पांच-पांच मिनिटांना नाड्या आंखडूं लागली तेव्हां? भिलवडीवरून औदुं-बरला जातांना टांगेवाल्यानें एका घोड्याच्या टांग्यात नऊ माणसें कोंबलीं तेव्हां? आणि गाणगापूर स्थानकांत उतरल्यावर बसवाल्यानें उतारू हे जणु जड, अचेतन पदार्थ आहेत अशा समजुतीनें एकावर एक डावले तेव्हां? जणुं प्रत्येक वेळीं तो दत्त अवधूत मला म्हणत होता. 'माझ्या दर्शनाला यायचें तर एवढी देहदंडना सोसायला हवी. तपावांचून मी सुलभ नाहीं!'

बसल्या जागीं अर्धा तास आणि प्रवासांत एक तास युगासारखा घालवून आम्ही एकदाचे गाणगापुरांत उतरलो. ज्या पुजाऱ्याच्या घरीं आम्ही यजमान म्हणून गेलों तिथें आधींचे यात्रेकरू कोणी नसल्यामुळें त्याच्या धाब्याच्या घरांतली एक खोली आम्हांला मिळूं शकली. गाणगापूर हें 'दर्शनीय' आहे हें मान्य; पण तें प्रेक्षणीय मात्र मुळींच नाहीं. तिथें ना एखादें शिल्प, ना एखादी कलाकुसरीची डोळ्यांत भरणारी वास्तु. सगळा सुकाळ तो धुळीचा. झाडापेडांचा वषट्कार असल्यामुळें वारा कोणाला डोलवील आणि कोणाला आंदुळील? एखाद्या आचरट पोरासारखी त्याची नि धुळीचीच सदैव गांठ.

थोडा वेळ प्रवासाचा शीण घालवून आम्ही दत्तमहाराजांची धूळभेट घेण्यासाठीं निघालो. पूर्वद्वारानें सभामंडपांत प्रवेश करतांच डाव्या हाताला जें देवस्थान दिसलें, त्याला देऊळ असे कांहीं म्हणतां येणार नाहीं. एका प्रशस्तशा चौथऱ्यावर उभा‍लेला तो एक छोटासा मठ आहे. दत्ताच्या ' कावें झोळी पुढे श्वान ' तसे मागे औदुंबर, पिंपळ असायचेच. वाडी-औदुंबराप्रमाणेंच हें क्षेत्रहि श्रीनृसिंहसरस्वती यांच्या वास्तव्यानें निर्माण झालेलें आहे. तिकडूनच ते इथें आले, इथें कांहीं काल राहिले आणि पुढें श्रीशैल्य पर्वतावर जाऊन तिथल्या पाताळगंगेंत गुप्त झाले.

महाराज इथें आल्यावर प्रथम संगमावरच राहत. माणसांच्या पायरवानें मळलेल्या त्या रम्य एकांतस्थळीं ते योगमुद्रा लावून बसत. फक्त माध्यान्हाला भिक्षेसाठीं तेवढे गांवांत येत. स्वामींची भिक्षा म्हणजे गृहस्थाची पर्वणी. ज्याच्या पदरीं पुण्यसंचय असेल तोच त्या भाग्याचा धनी व्हायचा. लौकिक-दृष्टया तो दरिद्री असला तरी महाराज त्याला डावलीत नसत.

एक दिवस असेच एका अकिंचनाच्या दारीं जाऊन ते ' ओंभवती ' म्हणाले. पण घरधनी बाहेर आला तो कष्टी मुद्रेनें आणि रित्या हातानें.

" महाराज, आपण अनुग्रह करायला आलात खरे; पण मी घेऊं कशांत तो ? माझा पदर फाटका—"

" असा उदास कां होतोस ? तुझ्या घरीं म्हैस आहे. मला भांडंभर दूध दिलंस तरी पुष्कळ आहे."

" काय सांगूं अतिथिदेवा ! ती म्हैस वांझ आहे. केवळ कडब्याला काळ आणि धरणीला भार."

" असं ? जा. चरवी घेऊन ये. खालीं बसून माझ्यादेखत आचळ ओढ तिचे."

ब्राह्मणाला तें वेडेपण वाटलें. पण एका तपोधन यतीचा शब्द मोडायला नको म्हणून त्यानें त्या म्हशीच्या विसविशीत कासेला हात घातला. आणि काय सांगावे ! एक पाढरी शुभ्र दीर्घ अशी धार भांड्यांत वाजली आणि मग झुरुमुरु झुरुमुरु सुरू झालें. ब्राह्मणाचें हृदय आश्चर्यानें आणि भांडें दुधानें

फेसाळत ओसंडलें. यतिवर्य संतोष पावले आणि ब्राह्मणाच्या घरीं कायमचें दुभतें झालें.

ग्रामाधिकाऱ्याला जेव्हां ही नवलपरी कळली आणि जेव्हां त्यानें 'चक्षुर्वै सत्यम' खात्री करून घेतली तेव्हां त्याला वाटलें कीं, स्वामी हे साक्षात् ईश्वरी अवतार आहेत. त्यानें संगमावर जाऊन विनीतभावानें स्वामींना प्रार्थिलें कीं, 'महाराज, मी आपणाला एक मठ उभारून देतों. आपण तिकडेच रहायला यावें. म्हणजे आम्हांला हरघडी दर्शनाचा लाभ मिळेल. गांवाचें भाग्य उजळेल.' स्वामींनीं ती विनंति मानली. उभारलेल्या मठांत प्रवेश करतांना आधीं त्यांनीं तिथें विघ्नहर गणपतीची स्थापना केली. तोच गणराज आजहि त्यांच्यासमोर आहे. आणि इथून श्रीशैल्यावर जातांना त्यांनीं इथें ज्या पादुका ठेवल्या त्याच सांप्रत त्या मठांत आहेत. या पादुकांच्या दर्शनासाठींच दत्तभक्त पडतील ते कष्ट सोसून इथें धाव घेतात.

वाडीच्या 'मनोहर पादुका' एका काळ्या शिळेवर उमटलेल्या आहेत. इथल्या 'निर्गुण पादुका' ओबडधोबड असल्या तरी स्वतंत्र आहेत. इकडे तिकडे करण्याजोग्या आहेत. त्या वालुकामय असल्यामुळें त्यांना पाद्य, अर्घ्य, अभिषेक हे जलोपचार होत नाहीत. फक्त केशर अष्टगंधादि सुगंधांचें लेपन करून पुढचे पुष्पादि उपचार समर्पितात. शिवाचें लिंग ; विष्णूचा शाळिग्राम तसें पादुका हें दत्ताचें प्रतीक आहे. मूर्ति असली तरी पादुकांची खरी पूजा. सर्वसंगपरित्यागी यतीचें पादुकांशिवाय दुसरें काय मागें उरायचें आहे ! शिष्यांना, भक्तांना तेंच मग परब्रह्म.

पहांटेपासून इथल्या कार्यक्रमांना आरंभ होतो. प्रथम काकडा आरती करतात. नंतर आदल्या दिवशींच्या महापूजेचें विसर्जन करून जो सालकरी पुजारी असेल तो पूजेला 'केशवाय नमः' म्हणतो. आधीं शाळिग्राम, बाण, दक्षिणावर्त शंख, नरसिंह इत्यादि परिवारदेवतांवर रुद्राभिषेक आणि मग निर्गुण पादुकांना केशरलेपन. दुपारीं महानैवेद्य होईपर्यंत निर्गुण पादुकांचें दर्शन घेतां येते. एकदा महापूजा बांधली कीं पादुका तिच्याखालीं झांकल्या जातात. त्यानंतर दर्शन करायचें तें त्रिमूर्तीच्या मुखवट्याचें. आणि तेंहि भिंतीला पाडलेल्या एका लहानशा झरोक्यांतून. सायंकाळची आरती झाल्यावर भालदार, चोपदार, पुजारी, सेवेकरी या सर्वांची सामुदायिक प्रदक्षिणा असते.

**इन्दुकोटितेजकिरणसिंधुभक्तवत्सलम्**
**नंदनाद्रिसूनुदत्तमिन्दिराक्षश्रीगुरुम्**
**गंधमाल्यअक्षतादिवृन्ददेववान्दितम्**
**वन्दयामि नारसिंह सरस्वतीश पाहि माम्**

हें त्या प्रदक्षिणेचें स्तोत्र. ते सांप्रदायिक असलें तरी शुद्ध नाहीं. त्यांतलें संस्कृत 'अनुस्वारेण संस्कृतम्' अशाच सदरांतलें आहे. गण-मात्रांचा तर पत्ताच लागत नाहीं. 'हें अष्टक जो पठण करील तो भवसिंधु तरून जाईल, त्याला दीर्घायुष्य, आरोग्य, संपदा तर लाभेलच; शिवाय सारें ज्ञानहि मिळेल' अशी त्या स्तोत्रपाठाची साग्रसंगीत फलश्रुति जाहीर केलेली असली तरी माझी कांहीं जीभ रेटणार नाहीं तें म्हणायला. नरसिंहसरस्वतीच्या नांवावर बनलेलें संस्कृत–मराठी पद्यवाङ्मय जवळजवळ याच धर्तीचें आहे. 'नरसिंहसरस्वत्या' काय, 'विश्वंभरिता' काय, 'योगच्छत्या' काय, 'परिपाता' काय, सगळीच मजा आहे. श्रद्धेनें पुष्कळदां माणसें आंधळीं होतात, तशींच तीं बहिरींहि होत असावीं. नाहीं तर असलें अशुद्ध अनगड वाङ्मय त्यांनीं भक्तिसाधन म्हणून वर्षानुवर्षें असें चोखाळलेंच नसतें. माझी नेहमींची तक्रार आहे कीं, दत्तदिगंबराला शिष्य भेटले, भक्त भेटले, चरित्रकार भेटले, पद्यकार भेटले, सगळे कोणी भेटले. भेटला नाहीं तो कवि मात्र. या दृष्टीनें राम-कृष्ण खरेखुरे भाग्यवान् !

गुरुवार हा इथला पालखीचा वार. याशिवाय एखाद्या भक्तानें आवश्यक तो खर्च केला तर कोणत्याहि वारीं पालखी निघू शकते. आम्ही रात्रीं आठाच्या सुमारास पुन्हा देवळांत गेलों तेव्हां पालखीच्या प्रदक्षिणा चालल्या होत्या. सगळें देवद्वार माणसांनीं फुलून गेलें होते. पालखीपुढें पदें, स्तोत्रें वगैरे पठण चाललें होतें; पण वाद्यांच्या गजरांत आणि सनई-सुरांच्या पेंपाऱ्यांत त्यांतलें ब्रह्माक्षरसुद्धा ऐकूं येत नव्हतें. सगळाच गोंधळ आणि गदारोळ. सुकाळ कशाचा असेल तर तो बेशिस्तीचा. अभाव कशाचा असेल तर तो व्यवस्थेचा. ठराविक दिवशीं ठराविक कार्यक्रमांची वेठ वारायची एवढीच काय ती जाणीव. पालखींतून उत्सवमूर्ति मंदिरांत नेल्यावर बाहेरच्या कट्ट्यावर मंत्रपुष्प चालतें तर त्याच वेळीं सभामंडपांत करुणा-त्रिपदी सुरू होते. आलेल्या यात्रिकांनीं हें ऐकायचें का तें? करुणात्रिपदी

अशा कांहीं पद्धतीनें म्हटली जाते कीं, त्यांत करुणेचा भाव कुठेंच व्यक्त होऊं नये. जणुं देवाला दमदाटी करावी तशा रीतीनें ते शब्दांवर आघात करतात. 'देवा, करुणा न करशील तर पहा आपला विचार!' आमच्या गोव्यांत वेताळाला प्रसादाच्या पाकळ्या लावल्या आणि बराच वेळ झाला तरी त्यांतली एखादीहि झडेनाशी झाली कीं पुजारी असाच देवाला दटावतो. 'देवा, बोल लवकर. उजवी दे. कृपा कर.' मला तीर्थ-प्रसादाची आवड होती म्हणूनच मीं त्या कोल्हाळांत तासभर जिवाचा घुस्मटमार सहन केला. आमच्या देवस्थानांत सर्वप्रथम कोणती सुधारणा करायला हवी असेल तर ती सेवेकऱ्यांची सामुदायिक शिस्त.

आमचे उपाध्ये मला म्हणाले, 'तुम्ही एकदा माघांतल्या उत्सवाला या. इथला सर्वांत मोठा उत्सव असतो तो.' आणि मग त्यांनीं आम्हांला त्या उत्सवाचें तपशीलवार वर्णन ऐकविलें. माघ वद्य प्रतिपदा ते चतुर्थी या चार दिवसांत इथें हजारो यात्रा जमते. पौर्णिमेच्या दिवशीं पहांटे निर्गुण पादुका विघ्नहर चिंतामणीच्या समोर आणून ठेवतात. प्रतिपदेच्या दिवशीं पादुका-दर्शन हें महत्फलदायक समजलें जातें. सकाळपासून तिसरा प्रहर उलटेपर्यंत दर्शनासाठीं भक्तांची रीघ लागते. नंतर सभामंडपांत परिव्राजकांची पाद्यपूजा झाल्यावर नदीकांठच्या केशवदेवाच्या पटांगणांत भोजनाच्या पंगती बसतात. चतुर्थीला माध्याह्नीं देवळांत गोपाळकाला झाल्यानंतर महाराज पालखींत बसून भीमास्नानाला जातात. श्रींच्या समागमें सहस्रावधि नरनारी पात्रांत उतरतात. एकाच वेळीं सगळा जनवृंद बुचकळ्या घेऊं लागतो. याच वेळीं कित्येकांच्या मानगुटीवरचीं भुतेंखेतेंहि अखेरचे आक्रंदन करून भिवरेचा तळठाव घेतात. नंतर टाळ–मृदंगांच्या घोषांत आणि भजनाच्या रंगांत पालखी परत येते. सुवासिनी लेण्ीं, लुगडीं लेवून महाराजांना ओवाळतात आणि मग अन्नसंतर्पण होऊन हा महोत्सव समाप्त होतो.

सकाळीं उठून आम्ही संगमाच्या वाटेला लागलों. भीमेच्या कांठाकांठानें जाणारी ती अर्धचंद्राकार वाट दोन मैल भरेल. दोन्ही बाजूंना ज्वारीचीं शेतें उभीं होतीं. हुरड्याच्या कणसांचा सगळीकडे थाट मांडला होता; पण आम्ही चित्ताला अनासक्तीचे पाठ देत त्यांच्यामधून पुढें चाललों होतों. उगवतीच्या सूर्याचे सुवर्णकिरण कणसांतल्या दाण्यांच्या फटींत सांकळलेल्या

दंवबिंदूंचे आचमन करीत होते. पौषमासाच्या त्या उग्र थंडींत संगमावर प्रातःस्नान करून उघड्या अंगानें गांवाकडे परतणारे कांहीं कमंडलुधारी तडीतापसी वाटेंत भेटत होते.

आणखी भेटत होत्या त्या शेतकरी बाया. पण त्यांची भाषा कानडी तर आमची मराठी. त्यांनीं 'यावरावरु' म्हणून विचारलें तेवढेंच मला समजत होते. मीं झोकात 'पुणें' म्हणून सांगितले. पण त्यांची जिज्ञासा तेवढ्याने कुठली शमायला! त्यानंतर त्यांनीं जे कांहीं पुसले तें पिकापाण्यासंबंधीं होतें, का दरधारणेसंबंधीं होतें, का आणखी कशासंबंधीं होत तें तर्कानेंसुद्धा न उमगल्यामुळें माझा झोक एकदम पडला. 'आम्हांला कानडी येत नाहीं' हें हावभावांनीं त्यांना कळवून आम्ही पुढे सटकलों. 'आरेभाषा' असले कांहीं म्हणत त्याहि आपल्या वाटेनें चालत्या झाल्या. कानडी लोक मराठीला आरेभाषा म्हणतात. आरेभाषा म्हणजे आर्यभाषा. द्रविडांच्या उत्तरसीमेवरचे आर्य म्हणजे मराठेच.

निम्म्या वाटेवर आम्हांला विश्रांतिकट्टा लागला. त्याच्यावर एक लहानशी देवळी आहे आणि पाठीमागें उभ्या असलेल्या वृक्षानें आपला एक स्कंध आडवा करून त्या कट्ट्यावर छाया केली आहे. जवळच्या शेताच्या कुंपणापाशीं 'शूद्रशेत' अशी पाटी लावलेली आहे. नरसिंहसरस्वती संगमावर ध्यानधारणेसाठीं जातां-येतां इथें थोडा वेळ विसावत. इथेंच तो भावार्थी शेतकरी पुढे येऊन रोज आदरानें त्यांना नमस्कार करी. त्याचा तो नेम पाहून एक दिवस स्वामींनीं त्याला विचारले--

"काय हवंय तुला?"

"माझ हे शेत महामूर पिकूं द्या महाराज. दुसरं कांहीं नको."

शेतकरी अधिक नमला. महाराजांच्या डोळयांत एक निराळेंच पाणी चमकलें.

"मी सांगेन तें ऐकशील?"

"ऐकेन महाराज."

"पहा, कचरशील."

"मुळींच नाहीं."

" मग मी दुपारीं परत येईपर्यंत तुझं हें सगळं शेत कापून टाक."

" आज्ञा !"

स्वामी पुढें निघून गेले आणि शेतकऱ्यानें विळा पाजळला. त्या हिरव्या रोपांवरून सपासप त्याचा हात फिरूं लागला. त्याच्या शीमशेजाऱ्यांनीं त्याला वेड लागल्याचें ठरवलें. बायको धावत येऊन कपाळ पिटूं लागली. पण त्याचा कांहीं हात थांबला नाहीं. स्वामी दुपारीं परत विश्रांतिस्थळीं आले. पहातात तों शेत निजलेलें आणि शेतकरी नमस्कारासाठीं पुढें आलेला. त्याची ती एकांतिक श्रद्धा पाहून स्वामींच्या मुखांतून आशीर्वाद निघाला; ' तुझं कल्याण होईल !'

आणि त्यानंतर दोनच दिवसांनीं आकाशाची चाळण फाटली. हत्तीच्या सोंडेसारखा अखंड अनुधार पाऊस सुरू झाला. लागोपाठ चार-पांच दिवस शिवारातलीं पोटरीला आलेलीं सगळीं शेतें कुजून माना टाकून पडलीं. पण त्याच पावसानें या शेतकऱ्याच्या कापलेल्या बुडख्यांना नवे धुमारे फुटले. सजीव, सकस आणि लवलव करणारे. जणूं स्वामींच्या कृपेचेच नवोन्मेष. त्या वर्षीं त्या रानांत त्याचें एकट्याचेंच शेत पिकलें. तेंहि इतकें अमाप कीं, आपलीं पेवे भरूनहि त्याने एकट्यानें गांवावरचा दुष्काळ निवारला.

आम्ही त्या कट्ट्याला प्रदक्षिणा घालून जरा तिथे टेकलों आणि पुढें निघालों. तिथून हांकेच्या अंतरावर उभे असलेले मोजकेच उंच वृक्ष शाखाकर हालवून आम्हांला म्हणाले, ' सरळ असे आमच्यापाशीं या. इथेच आहे संगम.' तिथें पोंचल्यावर उंच दरडीवरून घसरत घसरत आम्हांला पात्रांत उतरावें लागलें. प्रथम लागली वाळू. ती समुद्रकांठच्या वाळूपेक्षांही सूक्ष्म होती, मृदु होती. ' मानापमानांतला ' लक्ष्मीधर आमच्याबरोबर असता तर त्यानें आपलें सुखावलेलें फोपसें आंग इथे लोळवलें असतें आणि त्यांतच मोक्ष मानला असता. पुढें लागला मातीचा थर. तिचे पोपडे सुटले होते आणि खोबऱ्याच्या तुकड्यासारखे वाळून आंतल्या बाजूला वळले होते. एखादा उचलून चुरडला तर बुक्यासारखें चूर्ण व्हायचें. दगडाचा एक कणही हाताला लागायचा नाहीं. शिशिराने कृश केलेला भिवरेचा ओघ परतीराच्या अंगानें वहात होता. वर खालीं पाहिलें कीं असें वाटे, ही वांकड्या वळणांची भिवरा अदर्शनांतून आलेली आहे आणि अदर्शनांतच विलीन होत आहे.

अवघ्या वीस-पंचवीस मैलांवरून आलेली पूर्ववाहिनी अमरजा इथें भीमेला शरण जाते. तिचें पात्र मुखाजवळसुद्धां एखाद्या मोठ्याशा ओढ्यासारखें दिसतें. संगम खरा ; पण तो दोघी बहिणींचा आहे असें वाटत नाहीं. एखाद्या लाडिक मुलीनें बागडत येऊन आईच्या कमरेला मिठी घालावी तसें तें दृश्य सुकुमार आणि वत्सल दिसतें. अमरजा मिळाली म्हणून भीमेचा कांहीं व्यावहारिक फायदा झाला आहे असें मुळींच नाहीं. ती नसती तरी अधून मधून दिसणाऱ्या तिच्या निळया डोहांत तेवढेंच पाणी राहिलें असतें. तिला लाभ झाला असेल, तर तो एका अन्य प्रवाहाला निजरूप दिल्याचा. केवळ आध्यात्मिक.

आम्हीं तिथे संकल्पपूर्वक स्नान केलें. त्या ठिकाणीं सर्वत्र एकांत पसरला होता. ती निर्जनता मोडणारीं माणसें काय तीं आम्ही दोघेंच. आम्हीच काय बोलूं-सवरूं तें. पलीकडच्या तीरावर कांहीं टिटव्या पाण्याजवळून फिरत होत्या. पण त्यांची नजर होती पाण्यांतल्या मासोळ्यांवर. त्या आमची दखल घेत नव्हत्या. मी मात्र धुतलेलें धोतर वाऱ्यावर फडफडत सोडून त्यांच्या हालचाली न्याहाळीत होतों. त्यांचीं तीं करडीं पिसें, पावलें टाकतांना पुढें झुकणारीं गोंडस शरीरें, मधेंच उंचावणाऱ्या त्यांच्या माना, हें सगळेंच चित्तवेधक होतें. ज्यांचा पायांचा पिवळा जर्द रंग पाहून मोराला मत्सर वाटतो म्हणतात तो हाच पक्षी. आमचें आवरतें न आवरतें एवढ्यांत एक गृहस्थ सकुटुंब, सपरिवार घडेवरून पात्रांत खालीं उतरले. मीं म्हटलें, ‘ चला, एवढा वेळ सगळा संगम आमच्या ताब्यांत होता ; आतां आपण तो त्यांच्या स्वाधीन करून निवृत्त होऊं. ’

वर येऊन संगमेश्वराचें दर्शन घेतलें. संगमेश्वराच्यासमोरच नरसिंहसरस्वती ध्यानधारणेला बसत तें स्थान आहे. त्यांच्या काळीं तिथें एक अश्वत्थ होता. पुढें कांहीं कालानें तो वठला. त्याच जागीं सरदार रास्ते यांनीं लहानसें मंदिर करून त्यांत पादुका आणि लिंग स्थापले आहे. तिथें जवळच धर्मशाळाहि आहेत. कांहीं सेवेकऱ्यांनीं गाणगापुरांत राहण्याऐवजीं हें स्थान पसंत केलें आहे. निर्भर एकांत, सरितेचें सान्निध्य, वृक्षांची सावली आणि मोकळा वारा, हें निसर्गाचें सुख-साह्य इथें जसें मिळेल तसे तें गांवांत कुठून मिळणार!

**‘ स्थिरावली वृत्ति पांगुळला प्राण**
**अंतरींची खूण पावूनियां ’**

असा समाधियोग साधायला असलींच पवित्र स्थळें योग्य. ‘ हरि भोंवे भोंवताला ’ हा अनुभव साधकाला अशाच स्थळीं मिळायचा. तो एकदां ‘ जिवाचा गडी ’ झाला कीं मग हवी कशाला माणसांची संगतसोबत ! खरो-खर मला तें संगमस्थान प्रसादपूर्ण वाटलें.

## म्लेंच्छ राजा येउनि वंदी तव पायीं

ही घटना याच ठिकाणची. हा म्लेंच्छ राजा म्हणजे बेदरचा बादशहा. बिचारा किती दिवस तरी ‘ स्फोटका’ने तळमळत होता. श्रींची ख्याति ऐकून तो त्यांची दया मिळवण्यासाठीं निघाला आणि संगमाच्या सीमेंत पाय ठेवतांच त्याचें दुखणें बरें झालें. तसाच तो कुष्ठरोगी नरहरि. त्याला इथेच स्वामींनीं औदुंबराचें शुष्ककाष्ठ शिंपायला सांगितलें होते. त्यानें विकल्प न धरतां काम सुरू केलें. स्वामींना पहायची होती ती त्याची श्रद्धा. तें नाणें छन्-छन् वाजणारे आहे हें दिसून येतांच स्वामींनीं कमंडलूंतलें उदक प्रोक्षून त्याला पल्लव फोडले. तें अघटित डोळेभर पाहून नरहरि आपल्या देहाकडे दृष्टि वळवतो तर कुष्ठ नाहींसें झालेले. सगळें अंग कसें स्निग्ध आणि सुंदर. जणुं त्याला नवाच जन्म मिळाला. तो औदुंबर तिथें मूळ धरून वाढला होता. आल्यागेल्याला स्वामींच्या सामर्थ्याची साक्ष पटवीत राहिला होता. पण तीस वर्षांमागें भीमरथीला महापूर आला आणि तिनें त्याला मुळासकट उन्मळून देशांतरीं नेलें.

या संगमावर जर वर्षांतून एखादा उत्सव झाला नसता तर तिथले उपाध्ये, सालकरी अरसिकच म्हणावे लागले असते. पण इथें उत्सव होतो आणि तोहि शरदासारख्या प्रसन्न, सस्यश्यामल ऋतूंत. कार्तिक पौर्णिमा हा त्याचा दिवस. सकाळीं श्रींची उत्सवमूर्ति पालखींतून इथें येते. अभिषेक, महानैवेद्य, समाराधना अशा कार्यक्रमांत दिवस निघून जातो. रात्रीं आरती, तीर्थप्रसाद झाल्यावर पालखी गांवाकडे परतते. रात्रीची प्रशांत वेळ, वरून पूर्णचंद्राचा अमृत-वर्षाव, मागें पुढें दिवट्या, पलीकडे सगळें गाणगापूर दीपत्कारानें झळाळणारें, वातावरणांत फैलावणारा भजनाचा आणि टाळमृदंगांचा घोष, अशा आनंदोल्लासांत पालखी आपले गोंडे हालवीत चालते. वाटेच्या दोन्ही अंगीं रांग धरणाऱ्या ज्वारीच्या रोपांना महाराजांचे जीवनांतलें एकमेव दर्शन घडतें. लांबचीं रोपें नुसत्या प्रकाशालाच मान लववतात. आणि मग पालखी देवळांत येऊन सगळे उपचार होईपर्यंत पहांट फुटते.

संगमाजवळच तो भस्माचा डोंगर आहे. एका काळीं कदाचित् तो शिखर असलेला डोंगर असेल. पण असंख्य भक्त-भाविकांनीं मुक्तहस्तानें भस्म नेल्यामुळे आज त्याला चपट्या टेकडीचें स्वरूप आलें आहे. त्याच्यावर जिथें हात घालाल तिथें भस्मच सांपडेल. डिखळ फोडलें तरी तेंहि भस्मरूपच होईल. ती माती आहे का भस्म आहे अशी शंका येईल त्यानें वास घेऊन पहावा. हें स्थान म्हणजे एका काळची यज्ञभूमि असली पाहिजे. चातुर्मास्य, आप्तोर्याम अशांसारखे बहुसंख्य महायज्ञ अनेक ऋषि-मुनींनीं अथवा सामंत-मंडलेश्वरांनीं इथे सुसंपन्न केले असतील. उगाच का एवढा भस्माचा डोंगर बनूं शकेल ! आवश्यक तेवढें भस्म आम्हीं भरून घेतलें आणि सरळ गांवाचा मार्ग धरला. सूर्यानें डोळे वटारल्याकारणानें आतां रमत गमत जाणें सुखावह नव्हतें.

येतांना गांवाबाहेर एक आधुनिक पद्धतीची धर्मशाळा दिसली. तिचें बांधकाम पुरें होऊन आतां वास्तुशांतिच व्हायची राहिली होती. एका धर्मादाय निधींतून ती उभी झाली होती आणि तो निधि एका योगिराजाच्या पुण्याईतून निर्माण झाला होता. छत्तीस वर्षांपूर्वीची गोष्ट. मोंगलाईतल्याच धर्मबाद नांवाच्या गांवांतून चिदानंदस्वामी नांवाचे एक योगी इथें प्राप्त झाले सहा-सात महिने त्यांचें गाणगापुरांत वास्तव्य होतें. नंतर इथेंच त्यांनीं जलसमाधि घेतली. त्यांचा जडदेह वहात गेला. तो जवळच्याच इटगी गांवीं लागला. तिथल्या पाटलाला त्यांनीं दृष्टान्त दिला कीं, ‘ तरंगता देह वर काढून माझी इथें समाधि बांध. ’ त्यानें त्याप्रमाणें केलें. लोक त्या नव्या समाधीला नवस करूं लागले. आश्चर्यकारकपणें त्यांच्या मनकामना पुऱ्या होऊं लागल्या. ही वार्ता मोंगलाईभर पसरली. नवस आणि दर्शन यांसाठीं तिथें लोकयात्रा सुरू झाली. पुढें पुढें हें प्रमाण इतकें वाढलें कीं, समाधीपुढें फुटणाऱ्या नारळांचें पाणी अक्षरशः भिवरेला मिळूं लागलें. ‘ मीं देह ठेवल्यावर माझा प्रभाव काय तो तुम्हांला दिसेल ’ असें चिदानंदस्वामींनीं गाणगापुरच्या पुजाऱ्यांना सांगितलें होतें तें अनुभवास आलें. अवघी सहा महिने ही यात्रा चालली. पण तेवढ्यांत लोकांनीं समाधीपुढें ठेवलेलें द्रव्य सव्वा लाखाच्यावर भरलें. तें गेलें निजाम सरकारच्या तिजोरींत. तिथून तें बाहेर काढायला कांहीं वजनदार सद्‌गृहस्थांना बरीच चिकाटी दाखवावी लागली. आणि तुम्हांला तें सुभाषित ठाऊक आहेच. ‘ पुस्तकं वनिता वित्तम् ’ हें एकदां हाताबाहेर गेलें कीं परत मिळणें कठीण. आणि मिळालेंच तरी ‘ नष्टं भ्रष्टं च

खण्डितम् ! ' तसाच प्रकार इथेंहि घडला. जी रकम खटपट करणारांच्या हातीं लागली ती लाखांतहि कमीच. पण मिळाली तिचा उपयोग त्यांनीं धर्मशाळा बांधण्याच्या कामीं केला आहे. ठेकेदार श्री. देशमुख हे तिथें सर्व सुखसोयी करण्यासाठीं झटले आहेत. आतां आमच्यासारख्या यात्रेकरूंना केवळ उपाध्यांच्या ओंजळीनें पाणी प्यावें लागणार नाहीं.

आम्ही देवळांत दाखल होतों तर कट्टयावर आणि मंडपांत यात्रिकांचे पूजा-पाठ चालले होते. कित्येक स्त्री-पुरुष हातीं जपमाळ घेऊन मंदिरप्रदक्षिणा करीत होते. त्यांतच कांहीं भूतबाधेचीं ' झाडें 'हि रेंगाळत फिरत होतीं. नेमाचे सेवेकरी समोरच्या ओवऱ्यांतून गुरुचरित्र वाचीत होते. त्यांतलाच कोणी एक कानडी गद्य गुरुचरित्राचा पाठ करीत होता. ' चतुर्विध पुरुषार्थगळु सुलभवागि श्रीनरसिंहसरस्वती– ' असें त्याचें तें एका सुरांत चाललेलें वाचन पुरा अर्थ न समजतांहि माझ्या कानांना गोड वाटलें. एवढ्यांत श्रींचा महानैवेद्य आला. भालदारानें इतरांना मज्जाव म्हणून हातांतला रौप्यदंड दरवाज्याच्या चौकटींत तिरका ठेवला. पाठोपाठ कोणी तरी मंदिरांतला शुभ्र शंख बाहेर आणून फुंकला. त्याचा तो दीर्घ नाद ऐकतांच सर्वांनीं पटापटा साष्टांग नमस्कार घातले आणि सेवेकऱ्यांनीं माधुकरीच्या झोळया उचलल्या.

पूर्वद्वारांत कोणीं तरी मधुकरीची तयारी ठेवली होती. तिथें एकदम झुंबड उठली. बुभुक्षितांना रांगेत उभें राहून शिस्तींत माधुकरी घेण्याइतका दम कुठला ! आपली पाळी येण्यापूर्वीच परात वाजली तर करा काय, या भावनेनें सगळे एकमेकांवर पडत होते. इथें दानशूर धनवंतांनीं अन्नछत्रें, सदावर्तें ठेवलेलीं नाहींत. त्यामुळें ग्रामस्थांच्या घरीं जे काय चार-दोन कण मिळतील ते त्यांना परब्रह्म वाटतात. चतकोर भाकरी किंवा मूठभर भात रांधून वाढणारा परस्थ यात्रेकरू त्यामुळेंच तिथल्या सेवेकऱ्यांना धर्मावतार वाटतो. घरचें खाऊन सेवा करण्याइतकी ज्यांची ऐपत असेल ते सुद्धां ' गुरुप्रसाद ' म्हणून चार घरें मागतात. प्रत्यक्ष नरसिंहसरस्वतींनीं इथें भिक्षाटन केलें म्हणून इथली माधुकरी पुण्यपावन समजली जाते. अनेक दत्तभक्त माधुकरी घालण्यासाठीं म्हणून उपाध्यांकडे द्रव्य पाठवीत असतात. तिथले सेवेकरी अशाच अज्ञात, अपरिचित व्यक्तींच्या दानधर्मावर आपलें जीवन कंठीत असतात. मीं दुपारीं उपाध्यांच्या घरीं महाप्रसाद घेतला आणि पुन्हा एकवार निरोपाचे दर्शन घेऊन दत्तमहाराजांची त्रिस्थळी केल्याचें समाधान अनुभवीत स्टेशन गांठलें.

---